


# महाराष्ट्र लोकसेवा आयोग
## Maharashtra Public Service Commission

मुख्य कार्यालय : ५ १/२, ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई ४०००२१ दूरध्वनी - २२८२१७२८, २२८२११६७
फोर्ट कार्यालय : बँक ऑफ इंडिया इमारत, ३ रा माळा, फोर्ट, मुंबई ४००००१ दूरध्वनी :२२६७०२१०/१४८/२४८,२२१०२२२२. फॅक्स : २२६७३९१५

ई-मेल – sec.mpsc@maharashtra.gov.in वेबसाईट - www.mpsc.gov.in, https://mahampsc.mahaonline.gov.in


**निरिक्षक प्रमाणित शाळा व संस्था/रचना व कार्यपध्दती अधिकारी/ अधिव्याख्याता/जिल्हा महिला बाल विकास अधिकारी/ अधीक्षक/सांख्यिकी अधिकारी गट – ब, मिहला व बाल विकास विभाग. धारिका कमारांक : ९६६(अ)**

आयोगामार्फत महाराष्ट्र शासनाच्या महिला व बाल विकास विभाग यांच्या आस्थापनेवरील **निरिक्षक प्रमाणित शाळा व संस्था/रचना व कार्यपध्दती अधिकारी/ अधिव्याख्याता/जिल्हा महिला बाल विकास अधिकारी/अधीक्षक/सांख्यिकी अधिकारी गट – ब, महिला व बाल विकास विभाग** या पदाच्या १४७ जागांसाठी ऑनलाईन पद्धतीने अर्ज मागविण्यात येत आहेत. या पदासाठी अर्हताप्राप्त असलेले उमेदवार अर्ज करू शकतात.

३. **वेतनश्रेणी : ९,३००-३४,८०० +** (ग्रेड पे - ४,४००)/- अधिक इतर भत्ते -

४. **पात्रता -**

४.१ **वय**- अमागास उमेदवारांकिरता ३३ वर्षे व मागासप्रवगासारा ठी ३८ वषापरपेक जास्त नसावे.

४.२ शासकीय सेवेत नियमित नियुक्ती झालेल्या कर्मचा-यांच्या बाबतीत उच्च वयोमर्यादा १० वर्षांनी शिथिलक्षम राहिल. शासन सेवेतील मागासवर्गीय कर्मचा-यांना १० वर्षे शिथिलतेची सवलत ते शासन कर्मचारी किंवा मागासवर्ग म्हणून त्यापैकी केवळ एकाच कारणाकरीता उपलब्ध राहील.

४.३ शासन आदेशानूसार अपंग व खेळाडू इत्यादीसाठी वयोमर्यादा शिथिलम राहील.

४.४ **शैक्षणिक अर्हता :** संविधानिक विद्यापीठाची कला, विज्ञान, वाणिज्य, कृषि, कायदा, समाज कार्य, मानसशास्त्र, गृह विज्ञान किंवा पोषाहार यामधील पदवी किंवा पदव्यूत्तर पदवी किंवा त्यास समतुल्य म्हणून शासनाने मान्यता दिलेली इतर कोणतीही अर्हता धारण केली असेल.

४.५ परिविक्षाधीन कालावधी २ वर्ष राहील.

५. प्रस्तुत जाहिरातीमध्ये नमूद केलेली शैक्षणिक अर्हता, अनुभव इत्यादी अर्हता किमान असून, किमान अर्हता धारण केली म्हणून उमेदवार मुलाखतीस बोलाविण्याकरिता पात्र असणार नाही. जाहिरातीस अनुसरून प्राप्त झालेल्या अर्जाची संख्या वाजवी प्रमाणापेक्षा जास्त असेल आणि अर्ज सादर केलेल्या सर्व पात्र उमेदवारांच्या मुलाखती घेणे सोईस्कर नसल्यास मुलाखतीसाठी उमेदवारांची संख्या मर्यादित करण्याच्या दृष्टीने जाहिरातीत दिलेल्या शैक्षणिक अर्हता आणि/अथवा अनुभव यापेक्षा जादा शैक्षणिक अर्हता/अनुभव यांच्या आधारे किंवा अन्य योग्य निकष निश्चित करून अथवा चाळणी परीक्षेद्वारे मुलाखतीस पात्र उमेदवारांची संख्या मर्यादित करण्यात येईल. चाळणी परीक्षा घेण्याचे निश्चित झाल्यास, अर्हता आणि / अथवा अनुभव शिथिल केला जाणार नाही. चाळणी परिक्षेचा अभ्यासक्रम, परीक्षेचे माध्यम व इतर बाबी आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात येतील. प्रस्तुत जाहिरातीमध्ये भरतीसंदर्भातील संक्षिप्त तपशील दिलेला आहे. अर्ज करण्याची पद्धत, आवश्यक अर्हता, आरक्षण, वयोमर्यादा, शुल्क,निवडीची सर्वसाधारण प्रक्रिया

इत्यादीबाबतच्या सविस्तर तपशीलासाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या वेबसाईटवरील सरळसेवा भरती अंतर्गत "**उमेदवारांना सर्वसाधारण सूचना**" मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिद्ध करण्यात आलेली माहिती व जाहिरात अधिकृत समजण्यात येईल.

**६. जे उमेदवार चुकीची माहिती सादर करतील त्यांना या व पुढील सर्व निवडीसाठी अपात्र ठरविण्यात येईल.**

**७. कर्तव्ये व जबाबदाऱ्या** - प्रस्तुत पदाच्या कर्तव्ये व जबाबदाऱ्या याबाबतचा तपशील आयोगाच्या **www.mpsc.gov.in** वेबसाईटवर उपलब्ध आहे.

**८. शुल्क :**

**८.१ अमागास - रु. ३६५/- ८.२ मागासवर्गीय - रु. २६५/-**

**८.२ ज्या मागासवर्गीय उमेदवारांनी वयोमर्यादा, परीक्षा शुल्क व पात्रतेच्या निकषांमध्ये सवलत किंवा सूट याचा फायदा घेतला आहे, अशा उमेदवारांची सर्वसाधारण (अमागास) वर्गवारीच्या पदावर शिफारस करण्यात येणार नाही.**

**१०.** चाळणी परीक्षा घेण्याचे निश्चित झाल्यास चाळणी परीक्षेपूर्वी ७ दिवस अगोदर उमेदवारास प्रवेश प्रमाणपत्र त्याच्या प्रोफाईलव्दारे उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत उमदेवाराने चाळणी परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व चाळणी परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

**११.** चाळणी परीक्षेच्या वेळी उमेदवाराने प्रवेश प्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय चाळणी परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

**१२.** आयोगाच्या कार्यालयात, परीक्षा कक्षात, परीक्षा केंद्राच्या परिसरात तसेच मुलाखतीच्या वेळी मोबाईल फोन अथवा इतर कोणत्याही प्रकारची इलेक्ट्रॉनिक साधन आणण्यास व वापरण्यास सक्त मनाई आहे.

**१३.** खेळाडू वर्गवारीसाठी दावा करणा-या उमेदवारांनी त्यांची खेळाडूबाबतची प्रमाणपत्रे संचालक, क्रिडा व युवक संचालनालयाकडून अर्ज करण्यापूर्वीच प्रमाणित करुन घेण्यात यावीत.